प्रशासकीय मान्यता.
मौजे माळीण , ता.आंबेगाव, जि.पुणे येथे
स्मृतीवन उभारण्याबाबत..

# महाराष्ट्र शासन

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक- वनप-२०१४/प्र.क.९१/का.१७,

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- २७ ऑगस्ट, २०१४

**वाचा :-** मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-१/यो/प्र.क्र.२२/ ५१६/२०१४-१५, दि. १६-०८-२०१४.

**प्रस्तावना :--**

पुणे जिल्हयातील आंबेगाव तालुक्यातील माळीण हे गाव दि. ३०.७.२०१४ रोजी भूस्खलनात नष्ट झाले आहे. त्यामध्ये एकंदरीत १५१ लोकांचा मृत्यु झालेला आहे. या मृत पावलेल्या व्यक्तींच्या स्मृती जागरुक ठेवण्याच्या दृष्टीने रु. २,४९,६५,३७३ /-रक्कमेचा स्मृती वन उभारण्याचा प्रस्ताव मुख्य वनसंरक्षक ((प्रादेशिक), पुणे यांनी महसूल व वन विभागाकडे दि. १६.०८.२०१४ अन्वये सादर केला आहे. हया प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे यांनी स्मृतीवन उभारण्याच्या संदर्भात रु.२,४९,६५,३७३ /- ( रु. दोन कोटी, एकोणपन्नास लक्ष, पासष्ट हजार, तीनशे त्र्याहत्तर फक्त) रक्कमेचा जो प्रस्ताव सादर केलेला आहे त्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे व सन २०१४-१५ या वर्षात याकरिता रु. रु. १,००,००,०००/- ( एक कोटी फक्त) एवढी रक्कम मंजूर करण्यात येत आहे. सदरची रक्कम खर्च करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) पुणे हे राहतील व ही रक्कम त्यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. त्यांनी सदरची कामे शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या प्रचलित पध्दतीनुसार

करावीत. तसेच त्यांनी सदर कामाचा व खर्चाचा अहवाल वेळोवेळी आदिवासी विकास विभाग आणि महसूल व वन विभागाकडे सादर करावा.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र टी-५,२४०६, वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१, वनीकरण, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०५) पर्यटनासाठी वनांचा विकास करणे (२४०६ ६९४२) जिल्हास्तर योजना ०२, मजुरी २१, पुरवठा व सामग्री या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१४०८२७१८२०४७९४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sadanand Nurya Gavit

Digitally signed by Sadanand Nurya Gavit
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sadanand Nurya Gavit
Date: 2014.08.27 18:17:19 +05'30'

( स. नु. गावीत )

शासनाचे सह सचिव

प्रति,

१) मा. मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

२) मा. राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

३) प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

४) प्रधान सचिव (वने),महसूल व वन विभाग, विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

५) सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक

७) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे

८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे

९) मुख्य वास्तुविशारद, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/औरंगाबाद

१०) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

११) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ), पुणे

१२) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई

१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई

१४) जिल्हाधिकारी, पुणे

१५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१६) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, घोडेगाव, जिल्हा पुणे

१७) सर्व सह सचिव/ उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई

१८) आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६), मंत्रालय, मुंबई

१९) निवड नस्ती (का.१७)